**उद्योग वाढीसाठी कोविड - १९ च्या पश्च्यात राज्य शासनामार्फत करण्यात येत असलेल्या उपाययोजना....**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण २०२०/प्र.क्र. १२/तां.क.३**
१५ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०७/०८/२०२०.

वाचा :- शासन निर्णय क्रमांक : साप्रोयो २०२०/प्र.क्र.७३/उद्योग - ८, दिनांक ०६/०७/२०२०.

**प्रस्तावना :-**

कोविड - १९ महामारीमुळे जागतिक स्तरावर आर्थिक व औद्योगिक प्रगतीत अमुलाग्र शिथिलता आलेली आहे. कोविड - १९ विषाणूचा प्रादुर्भाव सुरु असलेल्या लगतच्या देशांमधून अनेक जागतिक दर्जाच्या उत्पादन कंपन्या एकाच देशातील अवलंबित्व कमी करण्याच्या उद्देशाने अन्य देशातील औद्योगिक गुंतवणूकीच्या संधीचा शोध घेत आहेत. अशा गुंतवणूकदार कंपन्या त्यांच्या उत्पादन साखळीत किमान व्यत्यय येईल व किमान खर्च येईल, अशा नजिकच्या पर्यायी ठिकाणांचा शोध घेत आहेत.

या पार्श्वभूमीवर कोविड - १९ प्रादुर्भावाच्य संकटकालीन परिस्थितीत देखील राज्यात औद्योगिक गुंतवणूक वाढीची संधी दिसून येते. अशा परिस्थितीत राज्यात परकीय गुंतवणूकदारांना आकर्षित करुन उद्योग वृध्दीसाठी कोणत्या उपाययोजना कराव्यात या संदर्भात मा. मंत्री (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या अभ्यास गटाने जागतिक दर्जाच्या बहुराष्ट्रीय व देशातंर्गत कंपन्यांना महाराष्ट्र राज्यात गुंतवणूक करण्यास सुलभ व्हावे यास अनुरुप परिणामकारक अभिनव अशा उपाययोजना उद्योग विभागाने मा. मंत्रीमंडळासमोर सादर केल्या होत्या. त्यानूसार मा. मंत्रीमंडळाने दिनांक २५/०६/२०२० रोजीच्या बैठकीमध्ये मान्यता दिली आहे. सदर उपाययोजनांमध्ये महापरवाना / जलद ना - हरकत परवाने उपलब्ध करणे यामध्ये पर्यावरण विभागाशी संबंधित संमतीपत्र प्रदान करण्याकरिता कालावधी कमी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानूसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय -**

जल (प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण) अधिनियम, १९७४ व हवा (प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण) अधिनियम, १९८१ व घातक घनकचरा नियम, २०१६ अंतर्गत उद्योगांना संमतीपत्र घेणे बंधनकारक आहे. या कायद्यानूसार १२० दिवसांच्या आत महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाने संमतीपत्र देणे बंधनकारक आहे.

सद्यस्थितीत कोविड - १९ च्या प्रादुर्भावामध्ये उद्योगांना महाराष्ट्रात उद्योग स्थापन करण्याच्या अनुषंगाने उद्योग विभागामार्फत महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाने संमतीपत्र प्रदान करण्याकरिता कमी केलेली कालमर्यादा खालीलप्रमाणे आहे -

| क्रमांक | विभाग | सेवा | नियमानूसार कालमर्यादा दिवसांमध्ये | प्रस्तावित कालावधी |
| --- | --- | --- | --- | --- |
| १२ | महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ | उद्योग उभारण्याकरिता संमतीपत्र<br>Consent to Establish | १२० दिवस | नारंगी / हिरवा संवर्ग १५ दिवस<br><br>लाल संवर्ग<br>३० दिवस |
| १७ | महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ | उद्योग चालू करण्याकरिता<br>Consent to Operate | १२० दिवस | नारंगी / हिरवा संवर्ग १५ दिवस<br><br>लाल संवर्ग<br>३० दिवस |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२००८१११४१८३०७९०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने.

Chandrakant Arun Vibhute

Digitally signed by Chandrakant Arun Vibhute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Environment Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8f5db4b58117f82ba510cc5eb279fa4eba706b24f6f921a77c28a792940c5517, serialNumber=b37242131913ce4ad7ffa0caa314c8163271f8af6410b5dff1fc5b4c3cc19b76, cn=Chandrakant Arun Vibhute
Date: 2020.08.11 14:24:12 +05'30'

**(चंद्रकांत विभूते)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. राज्यपालांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्याचे अपर मुख्य सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
४. सर्व विभागीय आयुक्त.
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ.
६. मा. सर्व मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
७. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय
८. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य
९. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
१०. मा. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
११. शासनाचे मा. मुख्य सचिव/ सर्व अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव यांचे खाजगी सचिव
१२. निवडनस्ती.